**सन २०१४-१५ मध्ये राष्ट्रीय औषधी वनस्पती अभियान ही योजना राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
## शासन निर्णय क्रमांकः आयुष-०११५/प्र.क्र.१८/९-अे

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १८ फेब्रुवारी,२०१५

**वाचा : केंद्र शासनाचे पत्र क्र.**

१) **F.No.Z. - 18020/48/2008-NMPB (pt.IV), Dt. 24 June, 2014**
२) **F.No.Z. – 18020/48/2008-NMPB (pt.IV)/932, Dt. 15 July, 2014 (General Category)**
३) **F.No.Z. – 18020/48/2008-NMPB (pt.IV), Dt. 15 July, 2014 (Tribal Areas Sub-Plan Category)**
४) **F.No.Z. – 18020/48/2008-NMPB (pt.IV)/933, Dt. 15 July, 2014 (SCSP Category)**

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाच्या राष्ट्रीय औषधी वनस्पती मंडळाच्या वतीने केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय औषधी वनस्पती ही योजना राज्यात " महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळामार्फत" राबविण्यात येते. सदर मंडळामार्फत राष्ट्रीय औषधी वनस्पती मंडळ, नवी दिल्ली यांच्या औषधी वनस्पती विषयक धोरणे व योजनांची अंमलबजावणी राज्यात करण्यात येत आहे.

राष्ट्रीय औषधी वनस्पती अभियान कार्यक्रमाकरिता केंद्र शासनाकडून १०० टक्के निधी उपलब्ध होत असून सन २००८-०९ ते २०१३-१४ या वित्तीय वर्षामध्ये एकुण रु. १४४५.३६ लक्ष इतका निधी परस्पर व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांना वितरीत करण्यात आलेला आहे. केंद्र शासनाने सन २०१४-१५ या वित्तीय वर्षासाठी राष्ट्रीय औषधी वनस्पती अभियान योजनेकरिता मंजुर रु. ७८६.५१ लक्ष रक्कमेच्या कार्यक्रमापैकी ७५ टक्के रक्कम म्हणजेच रु. ५८९.८८ लक्ष इतका निधी राज्याच्या एकत्रित निधीमध्ये जमा केलेला आहे. सदर योजनेस प्रशासकीय मान्यता देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राष्ट्रीय औषधी वनस्पती अभियान या कार्यक्रमाअंतर्गत औषधी वनस्पती रोपवाटिका, लागवड, संगोपन, काढणीत्तोर व्यवस्थापन, प्रक्रिया व मुल्यसंवर्धन व अभियान व्यवस्थापन इत्यादी घटकांसाठी अर्थसहाय्य देण्यात येते. या सर्व प्रयोजनासाठी केंद्र शासनाने त्यांच्या संदर्भ क्र.१ च्या पत्रान्वये एकुण रु. ७८६.५१ लक्ष निधी मंजुर केला असून सदर निधीपैकी ७५ टक्के म्हणजेच रु. ५८९.८८ लक्ष एवढा निधी उपलब्ध करुन देवून राज्याच्या एकत्रित निधीमध्ये जमा केलेला आहे. त्या अनुषंगाने राष्ट्रीय औषधी वनस्पती अभियान या कार्यक्रमाअंतर्गत वरील उद्दीष्टे पूर्ण करण्यासाठी रु. ५८९.८८ लक्ष (अक्षरी रुपये पाच कोटी एकोनव्वद लक्ष अठठ्याऐंशी हजार फक्त) एवढा निधी खर्च करण्याच्या योजनेस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. केंद्र शासनाने या योजनेअंतर्गत मंजुर केलेल्या निधीपैकी राज्यास उपलब्ध करुन दिलेल्या ७५ टक्के निधी रु. ५८९.८८ लक्ष (अक्षरी रुपये पाच कोटी एकोनव्वद लक्ष अठठ्याऐंशी हजार फक्त) एवढा निधी विगतवारी निहाय खालील प्रमाणे असेल:-

| अ.क्र. | योजना | केंद्र हिस्सा १०० टक्के (रक्कम रु. लक्ष) | राज्य हिस्सा | केंद्र हिस्सा उपलब्ध करुन दयावयाचे लेखाशिर्ष |
|---|---|---|---|---|
| १ | General Category | ४६५.०७ | -- | |
| २ | Tribal Areas Sub-Plan Category (TSP) | ५५.१५ | -- | |
| ३ | SCSP Category | ६९.६६ | -- | |
| | **एकुण** | **५८९.८८** | -- | |

३. राष्ट्रीय आयुष अभियानसाठी सन २०१४-१५ या वित्तीय वर्षामध्ये केंद्र शासनाने उपलब्ध करून दिलेला उपरोक्त निधी खालील उद्दीष्टांसाठी खर्च करण्यात येणार आहे :-

अ) औषधी वनस्पती लागवडीस प्रोत्साहन देणे, त्यास आर्थिक सहाय्य देऊन शेतक-यांचे आर्थीक उत्पन्न वाढविणे.

आ) आदर्श कृषी पध्दतीचा अवलंब करून जागतिक दर्जाचा औषधी माल उत्पादीत करून औषध निर्माते व उदयोगाला पुरवीणे.

इ) औषधी वनस्पतीच्या गुणवत्तापूर्ण मालाच्या निर्मितीसाठी आदर्श साठवण पध्दत राबविणे,

ई) औषधी वनस्पतींची रोपवाटीका तयार करणे, औषधी वनस्पतीच्या लागवडीच्या क्षेत्रात वाढ करणे, काढणीत्तोर व्यवस्थापन, प्रकीया व मूल्यवर्धन तपासणी प्रयोगशाळेची स्थापना करणे, पणन सुविधा, सेंद्रीय / आदर्श पिक पध्दती इत्यादी उपक्रम राबविणे.

४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांना सदर योजनेच्या अंमलबजावणीकरिता संपर्क अधिकारी म्हणून नामनिर्देशीत करण्यात येत आहे. या योजनेसाठी मंजुर केलेला निधी खर्च करण्यास व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांच्याकडे एक रकमी सूपर्द करण्यासाठी लेखा अधिकारी, महाराष्ट्र

राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२१८१३१७३०७७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAKHARKAR AMOL NILKANTH

Digitally signed by SAKHARKAR AMOL NILKANTH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AAHDDF,CID - 920025, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SAKHARKAR AMOL NILKANTH
Date: 2015.02.18 16:40:51 +05'30'

**अ.नि.साखरकर**
कार्यासन अधिकारी

**प्रति,**

व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, साखर संकुल, शिवाजी नगर, पुणे.

**प्रत,**

१. मा.मंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव,कृषी व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई.
२. मा.अपर मुख्य सचिव (कृषी) यांचे स्वीय सहाय्यक,कृषी व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई.
३. संचालक (फलोत्पादन),कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे.
४. सर्व संचालक,कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे.
५. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
६. सर्व जिल्हा अधिक्षक व कृषि अधिकारी
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
८. महालेखापाल (लेखा परिक्षा)मुंबई/नागपूर.
९. वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे.
१०.संचालक,लेखा व कोषागारे,मुंबई/अधिदान व लेखा कार्यालय मुंबई.